अनुसूचित जाती, नवबौध्द घटकांसाठी रमाई आवास योजना (शहरी क्षेत्र) घरकुलांबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: रआयो-२०२४/प्र.क्र.२९/ बांधकामे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ जुलै, २०२४

**वाचा :-** १. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीसीएच-२००८/ प्र.क्र.३६/मावक-२, दि.१५.८.२००८

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीसीएच-२००९/ प्र.क्र.११९/मावक-२, दि.९.३.२०१०

३. नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.संकिर्ण २०१९/प्र.क्र.१५/नवि-२६, दि.६.३.२०१९

४. गृहनिर्माण विभाग, शासन परिपत्रक क्र. प्रआयो-२०१८/ प्र.क्र.११६/गृनिधो-२, दि.२०.१०.२०१८

५. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.विसआ-२०१५/ प्र.क्र.८५/बांधकामे, दि.१५.६.२०१६

६. जिल्हाधिकारी,अहमदनगर यांचे दि.१४.१०.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

शासनाच्या "सर्वांसाठी घरे २०२२" या धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी शासन स्तरावरून प्रधानमंत्री आवास योजना प्रमाणे रमाई आवास योजने मधून लाभार्थ्यांना जास्तीत जास्त लाभ देणेसाठी संरक्षित झोपडपट्टी या अटीस पर्याय म्हणून जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी संदर्भाधीन क्र.६ अन्वये खालीलप्रमाणे शिफारस करण्यात आलेली आहे.

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय, दि.६.३.२०१९ नुसार प्रधानमंत्री आवास योजना अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रात असलेल्या सर्व शासकीय विभागांच्या (वन विभाग वगळून) जमिनींवरील अतिक्रमणे नियमानुकूल करण्यासाठी जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची तरतुद लागू करावी.

२. गृहनिर्माण विभाग,शासन परिपत्रक, दि.२०.१०.२०१८ नुसार प्रधानमंत्री आवास योजना अंतर्गत मागील तीन (३) वर्षाच्या मालमत्ता कराच्या पावतीच्या आधारे लाभार्थी पात्र करण्यात यावेत.

उपरोक्त जिल्हाधिकारी अहमदनगर यांनी केलेल्या शिफारशींस अनुसरून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासनाच्या "सर्वांसाठी घरे २०२२" या धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी शासन स्तरावरून प्रधानमंत्री आवास योजना प्रमाणे रमाई आवास योजने मधून लाभार्थ्यांना जास्तीत जास्त लाभ देणेसाठी संरक्षित झोपडपट्टी या अटीस पर्याय म्हणून या जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचेकडून करण्यात आलेल्या शिफारशीनुसार, प्रधानमंत्री आवास योजना अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रात

असलेल्या सर्व शासकीय विभागांच्या (वन विभाग वगळून) जमिनींवरील अतिक्रमणे नियमानुकूल करण्यासाठी नगर विकास विभाग, शासन निर्णय, दि.६.३.२०१९ नुसार जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरून सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या रमाई आवास योजना (शहरी) या योजनेकरीता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **समितीतील पद** |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी संबंधित | अध्यक्ष |
| २ | संबंधित महानगरपालिका आयुक्त अथवा त्यांनी नामनिर्देशित केलेला उपायुक्त किंवा नगरपरिषद/ नगरपंचायत मुख्याधिकारी (प्रकरणपरत्वे) | सदस्य |
| ३ | जिल्हा अधिक्षक, भूमी अभिलेख संबंधित जिल्हा | सदस्य |
| ४ | उप जिल्हाधिकारी, संबंधित जिल्हा | सदस्य |
| ५ | सहाय्यक संचालक, नगररचना संबंधित जिल्हा | सदस्य |
| ६ | प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण संबंधित जिल्हा | सदस्य |
| ७ | सहाय्यक आयुक्त,समाजकल्याण संबंधित जिल्हा | सदस्य सचिव |

वरील समितीने आवश्यकतेनुसार सहायक संचालक,नगर रचना यांच्या सल्ल्याने अतिक्रमणे नियमित करण्याची कार्यवाही करावी.

३. सदर समितीने नगर विकास विभागाच्या शासन निर्णय क्र.संकिर्ण २०१९/प्र.क्र.१५/नवि-२६, दि.६.३.२०१९ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून अशी अतिक्रमणे नियमानुकूल करण्याबाबत कार्यवाही करावी.

४. तसेच, गृहनिर्माण विभाग, शासन परिपत्रक, दि.२०.१०.२०१८ नुसार प्रधानमंत्री आवास योजना अंतर्गत मागील तीन (३) वर्षाच्या मालमत्ता कराच्या पावतीच्या आधारे लाभार्थी पात्र करण्यात यावेत असा निर्णय घेण्यात आला आहे. त्याच धर्तीवर रमाई आवास योजना (शहरी) करिता देखील लाभार्थी पात्रतेच्या निकषाकरीता मागील तीन वर्षाच्या मालमत्ता कराच्या पावतीच्या आधारे लाभार्थी पात्र करण्यात यावेत असा निर्णय घेण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र २०२४०७३११८३४४४३३२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA VIJAYSINH DESHMUKH

Digitally signed by PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=a2dd85b17cd3d5311cdc96ff87ec7bb1ccc64c56294fd60222073f2bd8dec000, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3D331EE44AE91C7D48D9B9DBBF7B7A7264F269283FAC405332FED75CFA968E89, cn=PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
Date: 2024.07.31 18:49:20 +05'30'

**( प्रज्ञा वि.देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई, महाराष्ट्र राज्य,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (गृह व विधी) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,

४. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
५. मा. विरोधी पक्षनेता विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
६. मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
७. मा. राज्यमंत्री ( सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
८. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
९. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
१०.सर्व सन्माननीय सदस्य, विधान सभा/ विधान परिषद
११.मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, महाराष्ट्र राज्य,
१२.मा. अमुस/प्रधान सचिव/सचिव (सर्व) मंत्रालयीन विभाग,
१३.मा. सचिव (सा.न्या. ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४.आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६.सर्व आयुक्त, महानगरपालिका
१७.महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
१८. सर्व मुख्याधिकारी नगरपरिषद/नगरपंचायत
१९.सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण विभाग
२०.सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग
२१.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,जिल्हा परिषद
२२.निवडनस्ती (बांधकामे).